जिल्हा हिवताप कार्यालय रायगड अलिबाग करीता घेतलेल्या खाजगी इमारतीच्या भाडेकरारास मान्यता मिळणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः हिनिका-२०२०/प्र.क्र..६०/आरोग्य-५

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, नविन मंत्रालय, मुंबई
तारीख: २५ ऑक्टोंबर, २०२१

**वाचा :-**

१) कार्यकारी अभियंता अलिबाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांचे पत्र क्र जाक्र.अवि/प्रशा २/७९३१, दि. २८.०८.२००६.
२) कार्यकारी अभियंता अलिबाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांचे पत्र क्र जाक्र.अवि/प्रशा २/८१८० दि. ०८.१०.२००९.
३) कार्यकारी अभियंता अलिबाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांचे पत्र क्र जाक्र.अवि/प्रशा २/९१०१, दि. ०९.०३.२०१२.
४) सहसंचालक आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रोग) पुणे यांचे दि. २०.११.२०१३ रोजीचे पत्र.
५) कार्यकारी अभियंता अलिबाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांचे पत्र क्र जाक्र.अवि/रेचिशा/५४४१, दि. १६.०६.२०१६.
६) सहसंचालक आरोग्य सेवा (हिहवजरोग) पुणे यांचे दि. २३.०१.२०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

जिल्हा हिवताप कार्यालय, अलिबाग-रायगड कार्यालयासाठी घर क्र. ५६/अ-१ व ५६/अ-२, लक्ष्मी नारायण कृपा, मौजे श्रीबाग, अलिबाग जि.रायगड येथील स्थानिक रहिवासी श्री. दत्तात्रय ना. वेटकोळी व सौ. भारती भ. वेटकोळी, यांच्या मालकिच्या इमारतीमधील अनुक्रमे ७९९.५७ चौ. फु व ९७४.०८ चौ.फु असे एकुण १७७३.६५ चौ.फु इतके चटई क्षेत्र असलेले दि.०१.०२.२००७ पासून ते आजपर्यंत भाडेतत्वावर घेण्यात आले आहे. सदर जागेकरीता उपरोक्त वाचा येथील संदर्भ क्र. ०१ ते ०५ पत्रान्वये कार्यकारी अभियंता अलिबाग सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग यांनी उपलब्ध करुन दिलेल्या दराने भाडे करारनामा करण्यात आले होते. तथापि कार्यकारी अभियंता अलिबाग यांना शासकिय दर व प्रचलित दर असे दोन दर दिल्याचे निदर्शनास आले. सदर भाडे करारनामे नियमानुसार शासकिय दराने करणे आवश्यक होते परंतू सन २००७ ते आजपर्यंत भाडे करारनामा

प्रचलित दराने करण्यात आल्याचे निदर्शनास आले. यास्तव दि. ०१.०४.२०१९ पासून श्री. वेटकोळी व श्रीमती भारती वेटकोळी यांना शासकिय दराने भाडे अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आता खालील प्रमाणे शासननिर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

१) जिल्हा हिवताप कार्यालय अलिबाग रायगड यांनी सन २०१९ ते सन २०२२ या कालावधीकरीता भाडे करारनामा शासन मान्यता न घेता, प्रचलित दराने करण्यात आल्याने सदर भाडे करारनामा रद्द करुन शासकीय दराने भाडे आकारुन सुधारीत करारनामा करण्यात यावा.

२) सदर करारनामा हा दिनांक ०१ एप्रिल, २०१९ ते दिनांक ३० ऑक्टोबर,२०२१ या कालावधीसाठी शासकिय दराने करण्यास शासनमान्यता देण्यात येत आहे.

३) सहसंचालक (हि.ह.व.ज.रोग), पुणे यांनी शासकिय दराने उपरोक्त कालावधीसाठी शासकिय दराने भाडे रकमेची परीगणना करुनच रक्कम अदा करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००८१७२७२४५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRANKUMAR VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc9db72365b55a7409cd8ad3c479621cc9f4985e6d1be8dd4cd1c4fdab3cbb14, pseudonym=5AD6BC99C173E8D779171190F8192DAE8D5E1557, serialNumber=2E35734EC976BF5657815FB42C4D25B0B3C23B4C69600638F3DEB172AC9E37F4, cn=KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
Date: 2021.10.25 15:46:08 +05'30'

**( किरण वाहुल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई/पुणे.
३) सहसंचालक आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रोग), पुणे
४) जिल्हा हिवताप अधिकारी, जिल्हा हिवताप कार्यालय अलिबाग-रायगड.
५) कार्यकारी अभियंता अलिबाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग.
६) श्री. दत्तात्रय वेटकोळी व श्रीमती भारती वेटकोळी, घर क्र. ५६/अ-१ व ५६/अ-२, लक्ष्मी नारायण कृपा, मौजे श्रीबाग, अलिबाग जि.रायगड